राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे करंजोशी पैंकी जुळेवाडी (ता. शाहूवाडी, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१४/प्र.क्र.८५/पापु-१७

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०५ सप्टेंबर, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/१०४(अ)/पापु-०७ दिनांक १७ मार्च २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर २०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
४) ग्रा.पा.पु.योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
५) ग्रा.पा.पु.योजनांच्या मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१६७/पापु-१७, दि. ०१ ऑगस्ट, २०१४
७) मु. का. अ. जि. प. कोल्हापूर यांचे पत्र क्र. जिप/ग्रापापुवि/जिपास/वशि/ /१४, दिनांक ०६ मार्च, २०१४

**प्रस्तावना:-**

मौजे करंजोशी पैंकी जुळेवाडी (ता. शाहूवाडी, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्र क्र. ७ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर योजनेस कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी दि. १५ फेब्रुवारी, २०१४ रोजी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. ग्रामसभेच्या मागणीनुसार जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेची नळ पाणी पुरवठा योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. सदर योजनेचा दरडोई खर्च हा रु. ९,२३५/- इतका असून, हा खर्च विभागाने संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये निर्देशित डोंगरी भागातील ५५ LPCD क्षमतेच्या योजनांसाठी निश्चित केलेल्या निकषाच्या १०० % मर्यादेपेक्षा

(रु.६,३६०/-) जास्त आहे. त्यामुळे संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार १०० % पेक्षा अधिक दरडोई खर्च असणा-या योजनांच्या प्रस्तावांना मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्च्छता यांचे अध्यक्षतेखालील प्रधान सचिव (वित्त), प्रधान सचिव (नियोजन) व प्रधान सचिव (पा.पु.व स्व.वि.) यांचा समावेश असलेल्या उच्चाधिकार समितीमार्फत मान्यता देण्यात येईल असे निर्देशित केले आहे. तद्नुषंगाने सदर उच्चाधिकार समिती समोर ५५ LPCD क्षमतेच्या व दरडोई खर्च रु.९,२३५/- असलेल्या मौजे करंजोशी पैंकी जुळेवाडी नळ पाणी पुरवठा योजनेचा रु. ४०,६३,४००/- इतक्या ढोबळ किंमतीचा प्रस्ताव मान्यतेस्तव सादर करुन वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, दरडोई खर्चाच्या निकषात न बसणा-या प्रस्तावांची छाननी करण्याबाबत शासन निर्णय क्र.६ अन्वये गठित करण्यात आलेली मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीची बैठक दि.२७ ऑगस्ट,२०१४ रोजी घेण्यात आली. सदर बैठकीत मौजे करंजोशी पैंकी जुळेवाडी (ता. शाहूवाडी, जि.कोल्हापूर) येथील ५५ LPCD क्षमतेच्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ९,२३५/- इतका दरडोई खर्च असलेल्या रु. ४०,६३,४००/- (रूपये चाळीस लाख त्रेसष्ट हजार चारशे फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली.

२. संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणी पुर्णत: रद्द करण्यात आली आहे.

३. ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या मौजे मौजे करंजोशी पैंकी जुळेवाडी नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

i) सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

ii) योजनेची कामे विहीत पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यापूर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा. पाईप्स्) घेण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी

iii) योजनेचे काम मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या पूर्ण करण्यात यावे. योजनेची कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. योजना योग्य पद्धतीने राबविण्याची संपुर्ण जबाबदारी ग्रामपंचायतीची व जिल्हा परिषद कोल्हापूर यांची राहील.

iv) ग्रामपंचायत करंजोशी यांनी आवश्यक ती पाणीपट्टी निश्चित करून योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरूस्तीसाठी येणारा खर्च भागवावा. त्यासाठी शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

v) योजनेमध्ये १००% नळ जोडणी करण्यात यावी.

vi) संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये योजनेची देखभाल व दुरूस्ती तसेच, त्रयस्थ यंत्रणा तपासणीबाबत देण्यात आलेल्या सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

vii) प्रचलित धोरणानुसार हागणदारीमुक्तीचे अभियान राबविण्यात यावे.

viii) कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासन अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

ix) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंदर्भात शासनाने विहीत केलेल्या प्रचलित मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०११६४२४७२५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL DEELIP P

Digitally signed by PATIL DEELIP P
DN: CN = PATIL DEELIP P, C = IN, S = : Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.09.05 13:49:33 +05'30'

**(दिलीप पां. पाटील)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य
४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
६) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
७) जिल्हाधिकारी, कोल्हापूर
८) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
११) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर

१२) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वी.सहा. मंत्रालय, मुंबई.
१३) मुख्य अभियंता (ना व ग्रा), म.जी.प्रा., ठाणे.
१४) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१५) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, समन्वय व सनियंत्रण कक्ष, पुणे
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, कोल्हापूर
१७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, (ना. व ग्रा.) योजना विभाग, कोल्हापूर
१८) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोल्हापूर
१९) निवड नस्ती पापु-१७